**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, कोळघर, ता.अलिबाग, जि.रायगड येथील इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.२९६/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १० जून, २०१०.

**वाचा :-** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, जि.रायगड यांचे पत्र क्र.शाआ-२०१०/प्र.क्र.१००४/का.१(४)/१०/२००१, दि.१७/२४ एप्रिल, २०१०.

**शासन निर्णय :-** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, कोळघर, ता.अलिबाग, जि.रायगड येथील शौचालय, पाण्याची पाईप लाईन, बहुउद्देशीय हॉल, दरवाजे, खिडक्यांची दुरुस्ती व फरशी बदलण्याबाबतचे रु.५,२५,६६२/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता देण्यासाठी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांनी शासनास सादर केले आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित सहाय्यक अभियंता श्रेणी-२ सा.बां.विभाग, अलिबाग यांनी तयार केले असून उप विभागीय अधिकारी, सा.बां.उपविभाग, अलिबाग यांनी तपासले आहे. तसेच मुख्याध्यापक, शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, कोळघर, प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांनी साक्षांकित केले आहे.

३. सदर शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर कामे दुरुस्तीचे असल्याने प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, कोळघर, ता.अलिबाग, जि.रायगड येथील शौचालय, पाण्याची पाईप लाईन, बहुउद्देशीय हॉल, दरवाजे, खिडक्यांची दुरुस्ती व फरशी बदलण्याबाबतचे रु.५,२५,६६२/-(रुपये पाच लाख पंचवीस हजार सहाशे बासष्ट फक्त) इतक्या रकमेच्या अदांजपत्रकास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु-मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयी-सुविधा पुरविणे आवयक आहे. सदर

काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हिडीओ शुटींग करुन त्याची सी.डी. शासनास सादर करावी.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५ मधील अ.क्र.१ व सार्वजनिक बांधकाम विभाग, नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००६१०१४४८५४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( ला.रा.गुजर )
अवर सचिव

**प्रति,**

महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे .
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण.
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग.
उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अलिबाग, जि.रायगड.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.